८८)

संकेतांक क्रमांक
201504271044236827

खोजनवाडी लघु पाटबंधारे तलाव,
ता.जत जि.सांगली योजनेस,
सुधारित प्रशासकीय मान्यता
प्रदान करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र. सुप्रमा १००९/(१६३/२००९) ल.पा.१
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०९ मे, २०११

**पहावे :** कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे जा.क्र.मकृखोविम/ २०९/(१४३/२००९)/लपा-२/५५५६, दि.१०.०८.२००९ चे पत्र

**प्रस्तावना :**

सांगली जिल्ह्यातील खोजनवाडी लघु पाटबंधारे तलावास महामंडळ निर्णय क्रमांक मकृखोविम २००/(४८७/२०००)/प्रमा/लपा-२/५८५४, दिनांक २१/६/२००० अन्वये रु.४०१.२८३६७/- लक्ष इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यांत आली होती. तद्नंतर माहे ऑगस्ट २००२ मध्ये योजनेच्या कामास प्रत्यक्ष सुरुवात झाली. परंतू निधी अभावी व प्रकल्पग्रस्तांच्या विरोधामुळे प्रकल्पाचे काम बंद ठेवण्यांत आले होते व त्यानंतर प्रकल्पाचा समावेश टंचाई निवारणामध्ये झाल्याने त्यास निधी प्राप्त झाला. आजतागायत प्रकल्पाचे काम प्रगतीपथावर आहे.

प्रकल्पाचे काम सुरु असतांना दरसूचीतील फरक, भूसंपादन किंमतीतील वाढ, संकल्प चित्रातील बदल व इतर कारणांमुळे किंमतीत झालेल्या वाढीमुळे सन २००८-०९ ची दरसुची वापरुन सुधारित अंदाजपत्रक तयार करुन रु ८५८.९१ लक्ष किमतीस सुधारित प्रशासकीय मान्यता मिळणे बाबतचा प्रस्ताव कार्यकारी संचालक, महारागष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे कडून शासनास प्राप्त झाला होता व तो शासनाच्या विचाराधिन होता. सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय

सांगली जिल्ह्यातील खोजनवाडी लघु पाटबंधारे तलावास सन २००८-०९ ची दरसूचीवर आधारित केलेल्या सुधारित प्राक्कलनानुसार कामाच्या अंदाजित **रु.८५८.९१ लक्ष** (रुपये आठ कोटी अठ्ठावन्न लक्ष ऐक्याण्णव हजार फक्त) त्यापैकी रु. ७९१.९६ लक्ष कामाप्रीत्यर्थ व रु.६६.९५ लक्ष अनुषंगिक खर्च) रकमेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. अंदाजित किंमतीचा गोषवारा सोबत जोडलेल्या विवरणपत्रात देण्यात आला आहे.

व्यय अग्रक्रम समितीच्या दि. १५ फेब्रुवारी २०११ रोजी झालेल्या बैठकीतील इतिवृत्तातील खाली दिलेल्या अटीच्या अधीन राहून मंजूरीचा हा निर्णय निर्गमीत करण्यात येत आहे.

१) सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या प्रस्तावास ढोबळमनाने तरतूद करु नये.

२) प्रकल्पावरील खर्च प्रशासकीय मान्यतेपेक्षा जास्त होण्याचे संकेत प्राप्त होताच सुधारित मान्यतेंचा प्रस्ताव सादर करण्यात यावे. प्रशासकीय मान्यतेपेक्षा जास्त खर्च करण्यात येणार नाही याविषयी दक्षता घ्यावी

३) वित्त विभागाने वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उप विभाग-एक ते पाच (सर्व विभागांना समान असलेले वित्तीय अधिकार) मध्ये दि.१५ मे,२००९ च्या शासन निर्णय क्र.विअप्र

१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम व्दारे सुधारणा केलेल्या आहेत. त्यानुसार स्पष्टीकरणात नमुद केल्याप्रमाणे ज्या प्रकरणी प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारांची मर्यादा ओलांडली जाईल त्या प्रकरणी संबंधित प्राधिका-यास जबाबदार धरण्यात येईल.

४) यापुढे महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिकेमधील अनुच्छेदानुसार तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेतील अटी व शर्तीनुसारच विभागाने काटेकोरपणे खर्च करावा, वित्त विभागाच्या पूर्वसंमतीशिवाय प्रकल्पाच्या वाढीव खर्चास निधी उपलब्ध करण्यात येणार नाही.

या योजनेच्या कामावरील खर्च मुख्य लेखाशिर्ष मागणी आय ५ "४७०२, लहान पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च-१९०, सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रमा यांतील गुंतवणुका (००)(०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ भाग भांडवली अंशदान (योजनांतर्गत) (४७०२ ४७९४) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाच्या मंजूर अनुदानातुन भागविण्यांत यावा.

जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण १०९९/(१२६/९९)/मो.प्र.(प्र.), दि.१८.५.९९ मधील तरतूदीनुसार व आंतरवित्त सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने तसेच वित्त विभागाचे पत्र क्रमांक व्यअस-बैठक-२०११/प्र.क्र.१६१/अर्थसंकल्प-२,दिनांक-२९/३/२०११ अन्वये व्यय अग्रक्रम समितीने दिलेल्या मंजूरीनुसार हा निर्णय निर्गमित करण्यांत येत आहे. सदर निर्णयास नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ८४/१४३४ दि. १५/९/१० आणि वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.४४३/१०/अर्थ-२, दि.३०/०९/१० अन्वये सहमती प्राप्त झाली आहे. या योजनेस प्रदान केलेली सुधारित प्रशासकीय मान्यता अ.क्र. /२०११ वर नोंदविण्यांत आलेली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने

( मिलींद हरदास )
**शासनाचे कार्यासन अधिकारी**

प्रत अंदाजित किंमतीच्या गोषवाऱ्यासह :-

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपुर
कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे
मुख्य अभियंता (जसं.), जलसंपदा विभाग, पुणे
आंतर वित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, पुणे
कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विकास विभाग, सांगली
उपसचिव (लपा)/अवर सचिव(लपा)/उपअभियंता(लपा-१), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासन अर्थ १-२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी सांगली, सांगली
स्वीय सहायक, मा.मंत्री, जलसंपदा (कृष्णा खोरे विकास महामंडळ), मंत्रालय, मुबई
स्वीय सहायक, मा.राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई
विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क, महासंचालक, मंत्रालय, मुंबई
ल.पा.१ कार्यासन संग्रहार्थ

(शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र सुप्रमा १००९/(१६३/२००९)/ल.पा.१, दि. ०९ मे, २०११ चे सहपत्र)

**विवरण पत्र**

खोजनवाडी लघु पाटबंधारे तलाव, ता.जत जि.सांगली

अंदाजित किंमतीचा गोषवारा

| अ.क्र. | उपशिर्ष | किंमत (रु. लक्ष) |
|---|---|---|
| १. | अ - प्राथमिक | ३.४९ |
| २. | ब - भूसंपादन | १२२.४७ |
| ३. | सी - कामे | ६५४.८६ |
| ४. | ई - विमोचक | ८.२८ |
| ५ | के - इमारत | ०.०० |
| ६. | एम - वृक्षारोपण | ०.०० |
| ७. | ओ - संकीर्ण | २.८७ |
| ८. | पी - देखभाल | ०.०० |
| ९. | आर - दळणवळण | ०.०० |
| | **एकूण** | **७९१.९६** |
| १०. | इ.टी.पी (१० %) | ६६.९५ |
| | **एकूण** | **८५८.९१** |

**ठळक वैशिष्टे**

१. योजनेची सिंचन क्षमता - ३३८ हेक्टर

२. नियोजित पाणी साठा - २१४६ स.घ.मी.

३. पाणी साठ्याची प्रती स.घ.मी किंमत - रु. ४००२३.००/-स.घ.मी.>मापदंड ८१४७/ स.घ.मी.

४. लाभव्यय गुणोत्तर - १.४० > १.००